ग्रामीण नळ पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणी पुर्वी संबंधित नळजोडणी धारकाकडून हमीपत्र घेणेबाबबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र.१८६/पापु-१९**

७ वा माळा, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, नवीन इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ०६ ऑगस्ट, २०१८

वाचा

१) शासन पत्र क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.१८६/पापु-१९, दिनांक २७ ऑक्टोबर, २०१७
२) शासन पत्र क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.१८६/पापु-१९, दिनांक ०९ मार्च, २०१८
३) शासन पत्र क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.१८६/पापु-१९, दिनांक १८ एप्रिल, २०१८

**प्रस्तावना:-**

राज्याच्या ग्रामीण भागातील पिण्याच्या पाण्याचा प्रश्न सोडविण्यासाठी विविध कार्यक्रमांतर्गत (राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जलस्वराज्य टप्पा-२ इ.) पाणीपुरवठा योजना राबविण्यात येत आहेत. पाणीपुरवठा योजनेचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणेपुर्वी योजनेच्या मागणीबाबत व पाणीपट्टी भरण्यास तयार असल्याबाबत संबधित ग्रामपंचायतीचा/ ग्रामसभेचा ठराव घेण्यात येतो. तथापि, बहुतांश वेळा ग्रामस्थांना योजनेची पुरेशी माहिती नसते व पाणीपुरवठा योजनेच्या अंमलबजावणीनंतर गावातील लाभार्थ्यांकडून नळ जोडणी व मीटर जोडणी घेण्यास नकार दर्शविला जातो. तसेच ज्यांनी नळ जोडणी घेतली आहे त्यांचेकडून पाणीपट्टी भरण्यास टाळाटाळ केली जाते. त्यामुळे योजनांच्या देखभाल दुरुस्तीचा खर्च भागविणे शक्य होत नाही, पर्यायाने योजना देखभाल दुरुस्ती अभावी बंद पडतात व पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करण्या मूळ उद्देश असफ़ल ठरुन योजनेवर करण्यात आलेला भांडवली खर्च वाया जातो. ह्यासाठी सर्व ग्रामस्थांचा पाणीपुरवठा योजनेच्या अंमलबजावणीत पुरेसा सहभाग असावा म्हणून पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणीपुर्वी गावातील घरमालकांकडून पाणीपट्टी व मीटरजोडणीबाबत वैयक्तिक हमीपत्र घेऊन एक लॅमिनेटेड प्रत प्रत्येक कुटूंबाकडे देण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी नळ पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणीपुर्वी अथवा योजनांच्या प्रारंभापुर्वी गावातील सर्व घरमालकांकडून योजनेच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीकरिता आवश्यक पाणीपट्टी भरणेबाबत व स्वखर्चाने मीटरजोडणी घेणेबाबत सोबतच्या परिशिष्ट-अ मधील विहित नमुन्यात वैयक्तिक हमीपत्र घ्यावे. तसेच किमान ८० टक्के घरमालकांकडून हमीपत्र प्राप्त झाल्याशिवाय योजनेच्या कामाचे कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत. ८० टक्के हमीपत्र प्राप्त होऊन कार्यारंभ आदेश दिल्यानंतर उर्वरित २० टक्के घरमालकांकडून सुध्दा हमीपत्र घेण्यात यावे.

२. तसेच सद्य:स्थितीत ज्या योजनेचे बांधकाम सुरु आहे त्या योजनेपासून ज्या घरमालकांना पाणी दिले जाणार आहे त्या सर्व घरमालकांकडून सुध्दा हमीपत्र घेण्यात यावे.

३. संबंधित ग्रामपंचायतीने हमीपत्र प्राप्त झाल्याचे संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस कळविणे आवश्यक आहे.

४. घरमालकांकडून घेण्यात आलेल्या हमीपत्राची एक प्रत संबंधित घरमालकास लॅमिनेट करुन देण्यात यावी व एक प्रत ग्रामपंचायतीकडे ठेवण्यात यावी. घरमालकांनी ही लॅमिनेटेड प्रत सांभाळून ठेवावी.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०७०९१०३५५६८९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2018.08.06 15:54:07 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

४) उप सचिव तथा प्रकल्प संचालक (जलस्वराज्य-२), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
७) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
९) मुख्य /अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
११) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१२) निवड नस्ती (पापु-१९)

## परिशिष्ट-अ

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : मुपेयो-२०१८/प्र.क्र.१८६/पापु-१९,
दिनांक ०६ ऑगस्ट, २०१८ चे सहपत्र

## हमीपत्र

मी, श्री/श्रीमती -------------------------------- राहणार मौजे-----------तालुका------ जिल्हा------------ लिहून देतो/देते की, माझ्या गावात प्रस्तावित बांधण्यात येणा-या किंवा बांधण्यात येत असलेल्या पाणीपुरवठा योजनेमधून नळ जोडणी घेण्यास व नळ जोडणीनंतर ३ महिन्यांच्या कालावधीत स्वखर्चाने मीटर बसवून घेण्यास तयार आहे.

२. सदर पाणीपुरवठा योजनेच्या नियमित परिचलन व देखभाल दुरुस्तीकरिता प्रति कुटुंबामागे रु.--------- (प्रति वर्ष) इतका खर्च अपेक्षित आहे. त्यानुसार मी प्रतिमाह रु.----------- इतकी पाणीपट्टी भरण्यास तयार आहे व यामध्ये वेळोवेळी वाढ होण्याची शक्यताही आहे, याचीही मला पूर्ण कल्पना आहे.

३. उपरोक्त नमूद कालावधीत मीटर बसवून न घेतल्यास किंवा पाणीपट्टी भरण्यास माझ्याकडून टाळाटाळ/विलंब झाल्यास माझ्या घराला होणारा पाणीपुरवठा बंद करण्यास मी सहमती देत आहे. तसेच थकीत पाणीपट्टीची रक्कम व त्यावरील व्याज मला भरावे लागेल व न भरल्यास मला मिळालेली नळ जोडणी तोडण्यात येईल, पाणीपुरवठा बंद करण्यात येईल याची मला पूर्ण कल्पना आहे. मी असेही लिहून देतो/देते की, मला देण्यात आलेल्या हमीपत्राची लॅमिनेटेड प्रत मी नेहमी सांभाळून ठेवेन.

**ठिकाण :**

**दिनांक :**

**घरमालकाचे/नळजोडणी धारकाचे**
**नाव व स्वाक्षरी**

**स्वाक्षरी घेणा-या शासकीय कर्मचाऱ्याचे**
**नाव, पदनाम व स्वाक्षरी**